**कोंढाणे लघु पाटबंधारे प्रकल्प, ता. कर्जत, जि. रायगड प्रकल्पाच्या कामाचे उर्वरीत देयक अदायगीबाबत व मूळ प्रशासकीय मान्यते पेक्षा जादा खर्च करण्यास मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्र. कोंढाणे -२०२८/(प्र. क्र.९/२०१८)/खारभूमी**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : १४ मार्च, २०२४

**पहावे :-**

१. शासन निर्णय क्रमांक :संकीर्ण २०१६/(३१२/१६)/२०१६ खारभूमी,मंत्रालय,मुंबई दि.१८.०८.२०१७
२. शासन शुध्दीपत्रक संकीर्ण २०१६/(३१२/१६)/२०१६ खारभूमी,मंत्रालय,मुंबई दि.०४.१०.२०१७
३. कोकण पाटबंधारे विकास विकास महामंडळ,ठाणे यांचे पत्र क्र.कोंपविम/तां-६/कोंढाणे /(धा.क्र.७/प्र.क्र.१)/३०८४/२०२३ दि.०५.०९.२०२३
कोकण पाटबंधारे विकास विकास महामंडळ,ठाणे यांचे पत्र क्र.कोंपविम/तां-६/कोंढाणे /(धा.क्र.७/प्र.क्र.१)/४२२०/२०२३ दि.१३.१२.२०२३

**प्रस्तावना :-**

कोंढाणे लघु पाटबंधारे प्रकल्प, ता. कर्जत, जि. रायगड प्रकल्पास शासन निर्णय दि.१९.०५.२०११ अन्वये रु. ८०.३५ कोटी रक्कमेस मूळ प्रशासकीय मान्यता प्राप्त आहे.

या प्रकल्पाचे कंत्राटदाराने कामाचे देयक मिळणेकरीता मा.उच्च न्यायालय,मुंबई येथे रिट याचिका क्र. ४०४/२०१३ दाखल केली. सदर याचिके अंतर्गत दि.०९.०३.२०२३ रोजी मा. उच्च न्यायालयाने पुढीलप्रमाणे अंतिम निकाल दिलेला आहे.

"As far as the payment is concerned, the CIDCO has deposited an amount of Rs. **99.15** Crores with the state Government. The State Government shall take steps with regard to the payment, as may be permissible and which according to the State Government, the Petitioner would be entitled to. The said decision shall be taken preferably within three months. The Public Interest Litigation along with all the writ Petitions and Interim Applications stand disposed of. No costs."

शासन निर्णय दि.१८.०८.२०१७ नुसार कोंढाणे प्रकल्प सिडकोस हस्तांतरित करण्यात आला आहे. शासन शुध्दीपत्रक दि.०४.१०.२०१७ अन्वये " झालेल्या कामाची करारानुसार येणारी रक्कम कोंकण पाटबंधारे विकास महामंडळाने कळविल्यानंतर ती सिडकोने शासनास अदा करावी, शासन सदर रक्कम कोंकण पाटबंधारे विकास महामंडळास कंत्राटदाराचे दायित्व भागवण्यासाठी उपलब्ध करून देईल. भविष्यात आर्थिक बाब उद्भवल्यास मा.मंत्रिमंडळाच्या मान्यतेने निर्णय घ्यावा " असे निर्देश देण्यात आले आहेत.

दि.१९.०४.२०२३ च्या पत्रान्वये सदर कंत्राटदाराचे झालेल्या कामाचे देयक अदा करणेबाबत कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ,ठाणे यांनी कळविले होते.त्यानंतर दि.०५.०७.२०२३ अन्वये कंत्राटदारास प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत देय होऊ शकणारी रु.८०.२० कोटी रक्कम अदा करण्यास मान्यता दिली होती व उर्वरित रु.१८.४७ कोटी रक्कम राखून ठेवण्यात आली होती. संदर्भ क्र.४ अन्वये कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ,ठाणे यांचे कडून रु.१८.४७ कोटी अधिक GST रु.१०.९१ कोटी रक्कम कंत्राटदारास मा.उच्च न्यायालयाचे आदेशाचे अनुषंगाने अदा करण्याचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला होता. सदर रक्कम अदा करण्यासाठी मंजूर प्रशासकीय मान्यता पेक्षा वाढीव खर्च करणे अपरिहार्य होते ,तथापि प्रकल्प सिडको यांना हस्तांतरित केल्याने व झालेल्या खर्चाचे दायित्व भागवण्याची जबाबदारी सिडकोची असल्याने प्रस्तुत प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता न देता मा.मंत्रिमंडळ मान्यतेने निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत दि.०५ फेब्रुवारी २०२४ रोजी झालेल्या मा.मंत्रिमंडळाच्या बैठकीतील मान्यतेस अनुसरून शासन पुढील प्रमाणे निर्णय निर्गमित करीत आहे.

**शासन निर्णय :-**

१. कोंढाणे प्रकल्पाच्या रिट याचिका क्र. ४०४/२०१३ मधील दि.०९.०३.२०२३ रोजीच्या मा.उच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयानुसार देयक अदायगीसाठी, मूळ प्रशासकीय मान्यता किंमतीपेक्षा रु. २९.२३ कोटी जादा खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. कंत्राटदाराचे उर्वरित देयक अदा करणेसाठी सिडकोकडून प्राप्त झालेल्या निधीमधील उर्वरित रक्कम रु. १८.४७ कोटी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. प्रलंबित रक्कम ( GST व प्रलंबित देयक ) अदा करण्यासाठी रु.१०.४३ कोटी निधी मागणी सिडको यांच्याकडे करण्यास व सिडको कडून प्राप्त होणारी रक्कम कंत्राटदारास अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी शासन निर्णय दि.२८.११.२०१९ ची पूर्तता झाल्या बाबतची खातरजमा महामंडळ स्तरावरून करण्यात यावी.

५. देयक अदायगीच्या कालावधी मध्ये कुठल्याही प्रकारचे व्याज निविदा शर्तीनुसार देय होत नाही व या अदायगी नंतर कंत्राटदाराचे कोणतेही देणे शिल्लक राहत नाही याबाबतचे अभिवचन (Undertaking) कंत्राटदाराकडून घेण्याची दक्षता महामंडळाने निधी वितरणापुर्वी घ्यावी व त्याशिवाय महामंडळाने निधी वितरण करू नये.

२. या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशीर्ष " ४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण १९०- सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३११/२०२३/का-१४३४, दिनांक २९.१२.२०२३ व अनौपचारिक संदर्भ क्र.३६६/का-१४३३, दिनांक २९.१२.२०२३ अन्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र./व्यय-१२, दिनांक ०२.०१.२०२४ अन्वये दिलेल्या

सहमतीनुसार तसेच दिनांक ०५ फेब्रुवारी २०२४ रोजी मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने निर्गमीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३१४१७१९५९६८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN SHIVAJI KOLHE

Digitally signed by PRAVIN SHIVAJI KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=d3179b092692e5a493ad13c482974ccf422b154ad3219b12b5a56d8ec2ed058e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A5CAFEFCF97B7EE559404B1081AE6CC80B0710E3FC3826245F60E43248C12F10, cn=PRAVIN SHIVAJI KOLHE
Date: 2024.03.14 17:29:11 +05'30'

**(प्रविण कोल्हे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री, (जलसंपदा) महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव मुंबई.
४. मा. उप मुख्यमंत्री, (वित्त व नियोजन ) महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव मुंबई.
५. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्ष नेते, विधानपरिषद/विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य,१/२ मुंबई / नागपूर.
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य,१/२ मुंबई / नागपूर.
९. जिल्हाधिकारी, रायगड.
१०. कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ,ठाणे
११. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षितता, मेरी, नाशिक.
१२. मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई.
१३. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४. उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१५. उप सचिव (लपा ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१६. अधीक्षक अभियंता ,ठाणे पाटबंधारे मंडळ,ठाणे
१७. अवर सचिव (खारभूमी),जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१८. अर्थ शाखा - १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१९. खारभूमी कार्यासन (संग्रहार्थ)